तात्काळ कालमर्यादा

मुख्यमंत्री सहायता निधी
राज्यातील अभूतपूर्व अशा अतिवृष्टीमुळे झालेल्या आपदग्रस्तांच्या मदतीसाठी शासकीय/निमशासकीय अधिकारी व कर्मचारी यांच्याकडून देणगया.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : सीएमएफ-२००५/प्र.क्र.५४/०५/१६-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १० ऑगस्ट,२००५.

वाचा : शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : सीएमएफ-२००५/प्र.क्र.५४/०५/१६-अ, दि.३.८.२००५.

**शासन परिपत्रक :-**

दि.२६ व २७ जुलै,२००५ रोजी महाराष्ट्रातील अनेक जिल्हयातून अभूतपूर्व अतिवृष्टिमुळे भूस्खलन व पुरामुळे प्रचंड प्रमाणात मनुष्य, वित्त व मालमत्तेचे नुकसान झाले. त्यामुळे राज्य शासकीय अधिकारी व कर्मचारी यांच्या मासिक वेतनातून एक दिवसाच्या वेतनाइतकी रक्कम कापून ती मुख्यमंत्री सहायता निधीमध्ये जमा करण्याचा निर्णय उपरोक्त दि.३ ऑगस्ट,२००५ च्या संदर्भाधीन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आलेला आहे. मात्र या अभूतपूर्व अतिवृष्टीमुळे ज्या शासकीय अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे वित्त व मालमत्तेचे नुकसान झाले आहे, अशा शासकीय अधिकारी / कर्मचारी यांनाच शासकीय मदतीची आवश्यकता असल्याने, याबाबत असे आदेशित करण्यात येते की, प्रत्यक्षात ज्या शासकीय / निमशासकीय अधिकारी/ कर्मचारी यांचे या अतिवृष्टीमुळे नुकसान झाले आहे अशा आपदग्रस्त अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतनातून एक दिवसाचे वेतन कापून घेण्यात येऊ नये.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( र.म.प्रधान )
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,
१. राज्यपालांचे सचिव,
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
४. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
*६.प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
*७. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
*८. प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,
*९. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
* १०. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*११.सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
*१२. सचिव, राज्य निवडणूक आयोग,मुंबई,
१३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
१४.महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र-२, नागपूर,
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१६.निवासी व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१७. सर्व विभागीय आयुक्त,
१८.सर्व महानगरपालिका यांचे आयुक्त,
१९. सर्व जिल्हाधिकारी/ जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२०.सर्व नगरपरिषदा / नगरपालिका यांचे मुख्य अधिकारी,
२१.राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे सर्व व्यवस्थापकीय संचालक,
२२.संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई (प्रसिद्धीपत्रक काढण्याच्या विनंतीसह)
२३.मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
२४.वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय, मुंबई,
२५.मंत्रालयातील सर्व विभाग
२६.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२७.निवड नस्ती.

*पत्राने

रोटा/एच-1029(4500-8-2005).